राज्य आपत्ती प्रतिसाद दल धुळे व नागपूर येथील २ कंपन्याच्या कार्यालयाकरिता प्रत्येकी ०१ सहायक लेखा अधिकारी पद निर्माण करण्यास मान्यता देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अेपीओ-३६१२/प्र.क्र.८०/पोल-३**

मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई
दिनांक : २८ एप्रिल, २०२२.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.डीएमयू-२०११/प्र.क्र.२२१/आव्यप्र-१, दि.१९/०५/२०१६
२) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे कार्यालयाचे पत्र क्र.पोमसं/२६-ब/राअप्रद/धुळे/पदनिर्मिती/७८/२०१७, दि.२२.०२.२०१९.
३) मा.उच्चस्तर सचिव समितीच्या दिनांक १४.०६.२०२१ रोजी पार पडलेल्या ३-या बैठकीचे कार्यवृत्त.

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय,महसूल व वन विभाग क्र.डीएमयू-२०११/प्र.क्र.२२१/आव्यप्र-१, दि.१९/०५/२०१६ अन्वये राज्य आपत्ती प्रतिसाद दलाच्या दोन कंपन्या निर्माण करण्यात आल्या असून, प्रत्येक कंपनी करीता २१४ अधिकारी/कर्मचारी याप्रमाणे दोन कंपन्याकरिता एकूण ४२८ पदे पोलीस महासंचालक यांच्या आस्थापनेवर मंजूर केली आहेत. त्यानुषंगाने दोन कंपन्या पैकी १ कंपनी राज्य राखीव पोलीस बल, गट क्र.४ नागपूर व दुसरी कंपनी राज्य राखीव पोलीस बल, गट क्र. ६ धुळे येथे स्थापन करण्यात आले आहे. उपरोक्त संदर्भ क्र.२ येथील दि.२२.०२.२०१९ रोजीच्या पत्राव्दारे पोलीस महासंचालक कार्यालयाने समादेशक, राज्य आपत्ती प्रतिसाद दल, धुळे व नागपूर या कार्यालयांकडील वित्तीय कामकाजाच्या दृष्टीने सुसूत्रता आणण्यासाठी तसेच आर्थिक बाबींमध्ये औचित्याचे पालन होण्याकरीता दोन्ही कार्यालयांसाठी प्रत्येकी कार्यालय अधीक्षक-०१, सहाय्यक लेखा अधिकारी-०१ अशी एकूण ०४ पदे निर्माण करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला होता. उक्त प्रस्ताव वित्त विभागाच्या मान्यतेने उच्चस्तरीय सचिव समितीपुढे सादर करण्यात आला असता, मा.उच्चस्तर सचिव समितीने दिनांक १४.०६.२०२१ रोजी झालेल्या ३ -या बैठकीमध्ये राज्य आपत्ती प्रतिसाद दल धुळे व नागपूर येथील २ कंपन्याच्या कार्यालयाकरिता प्रत्येकी ०१ सहायक लेखा

अधिकारी यप्रमाणे सहायक लेखाधिकारी या संवर्गाची एकूण २ पदे निर्माण करण्यास मान्यता दिली आहे. त्याअनुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय</u>:-**

राज्य आपत्ती प्रतिसाद दल, धुळे व नागपूर येथील २ कंपन्यांच्या कार्यालयासाठी प्रत्येकी ०१ सहायक लेखा अधिकारी (S-१५:४१८००-१३२३००) याप्रमाणे सहायक लेखाधिकारी या संवर्गाची एकूण २ पदे निर्माण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. उक्त पदासाठी होणारा वेतनावरील खर्च हा महसूल व वन विभाग (आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण) यांचेकडून मागणी क्र.६,२२४५,नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य ८०, सर्वसाधारण ८००, इतर खर्च ९२, आपत्ती प्रतिसाद दलाच्या मानका व्यतिरिक्त खर्च (९२) (०३) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त अन्य खर्च “२२४५ २५७९” या लेखाशिर्षाखाली उपलब्ध होणा-या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३५३/आपुक, दिनांक १६/३/२०२२ व्दारे वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या <u>www.maharashtra.gov.in</u> या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४२८१६०३३६१२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RUPALI SANJOG KABARE

Digitally signed by RUPALI SANJOG KABARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=825ec39543f0d33deccec30f6ca54b1adc430443efec55f07e98dc173423779d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5CB43A03D973FF96AABBF02A74864A4681399FE663D8FBDE0441A596BEB3ACDD, cn=RUPALI SANJOG KABARE
Date: 2022.04.28 16:05:11 +05'30'

**(रुपाली कबरे)**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री,गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.राज्यमंत्री,गृह (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरीष्ठ स्वीय सहायक,गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

५. प्रधान सचिव (विशेष) यांचे स्वीय सहायक,गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. क.अ/अ.स (आव्यप्र),महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई.
८. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. अपर पोलीस महासंचालक,राज्य राखीव पोलीस बल, महाराष्ट्र राज्य,मुंबई
१०.समादेशक, राज्य आपत्ती प्रतिसाद बल,धुळे/नागपुर.
११.अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी,वांद्रे,मुंबई.
१३.जिल्हा कोषागार अधिकारी,धुळे/नागपूर.
१४.वित्त विभाग (व्यय-७)/वित्तीय सुधारणा-१/आ.पु.क.
१५. निवड फाईल, पोल-३.